**+२ स्तरावरील (इयत्ता ११ वी व १२ वी) द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राज्यातील कनिष्ठ महाविद्यालयात राबविण्यासाठी नवीन सुधारीत मानकांना मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन निर्णय क्र.व्हिओसी-२०२३/प्र.क्र.१४/कौशल्य-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक -२४/११/२०२३

**संदर्भ**: - १) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्रमांक: व्हिओसी-२०२३/प्र. क्र. १४/कौशल्य-२, दिनांक:-२०/०६/२०२३.
२) संचालनालयाचे पत्र क्र.८/व्हिओसी/मानके/२०२३/६७, दिनांक. २५/१०/२०२३.

**प्रस्तावना: -**

राज्यात सद्यस्थितीत सुरु असलेल्या +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांऐवजी राष्ट्रीय व्यवसाय आराखडयाप्रमाणे (NSQF) नवीन अभ्यासक्रम शैक्षणिक सत्र २०२४-२५ पासून सुरु करण्यांस संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यांत आली आहे. सदर नवीन अभ्यासक्रमांची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक असलेली मार्गदर्शक तत्वे व सुधारीत मानके निश्चित करणे आवश्यक असल्याने नवीन सुधारीत मानकांना मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

राज्यातील +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमांऐवजी राष्ट्रीय व्यवसाय आराखडयाप्रमाणे (NSQF) नवीन अभ्यासक्रम सुरु करण्यास संदर्भ क्र.०१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिल्यानंतर सदर नवीन अभ्यासक्रमांची अंमलबजावणी करण्याकरीता नवीन मार्गदर्शक तत्वे व मानकांना खालीलप्रमाणे मान्यता देण्यांत येत आहे.

१. राज्यात राबविण्यांत येणारे नवीन द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम (जॉब रोल) **परिशिष्ट-अ** प्रमाणे असतील. गटात दर्शविण्यांत आलेले विषय -१ व विषय - २ हे प्रत्येकी १०० गुणांचे असतील व द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविण्याकरीता महाविद्यालयास गटातील दोनही अभ्यासक्रमांची निवड करुन आवश्यक सोईसुविधा उपलब्ध करणे आवश्यक राहील. विद्यार्थ्यांना सद्यस्थितीत २०० गुणांचा एक व्दिलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम निवडावा लागतो. त्याऐवजी गटातील प्रत्येकी १०० गुणांचे विषय-१ व विषय-२ निवडणे आवश्यक राहील.

२. प्रत्येक नवीन द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाकरीता (जॉब रोल) आवश्यक असलेली मानके (उदा.विद्युतभार, वर्गखोली, कार्यशाळा इ.) **परिशिष्ट-ब** प्रमाणे असेल. तसेच द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबवित असलेल्या विद्यमान महाविद्यालयांना नवीन अभ्यासक्रमासाठी आवश्यक मानकांची पूर्तता पुढील २ वर्षात पूर्ण करणे बंधनकारक राहील. तसेच द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम राबविणाऱ्या नवीन महाविद्यालयांना आवश्यक मानकांप्रमाणे पूर्तता केल्याशिवाय मान्यता देण्यांत येणार नाही.

३. पुनर्रचित अभ्यासक्रमातील प्रत्येक व्यवसाय अभ्यासक्रमाच्या (जॉब रोल) तासिका अभ्यासक्रमात (Syllabus) नमूद केल्यानुसार राहतील.

४. प्रत्येक व्यवसाय अभ्यासक्रमातील (जॉब रोल) विषय -१ करीता एक पुर्ण वेळ शिक्षक (प्रात्यक्षिक) व विषय -२ करीता १ पूर्णवेळ शिक्षक (प्रात्यक्षिक) अशी दोन शिक्षकीय पदे राहतील.

५. व्यवसाय अभ्यासक्रमनिहाय शिक्षकीय पदांची शैक्षणिक अर्हता व अनुभव **परिशिष्ट-क** प्रमाणे राहील. सदर परिशिष्ट-क मध्ये दर्शविण्यात आलेली शैक्षणिक अर्हता व अनुभव पंडीत सुंदरलाल शर्मा सेंट्रल इन्स्टिटयूट फॉर व्होकेशनल एज्युकेशन (PSSCIVE), भोपाळ यांनी मान्यता दिलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमात (Syllabus) नमुद केल्यानुसार ग्राहय धरण्यात आलेली आहे.

६. विद्यमान महाविद्यालयांमधील सद्यस्थितीत कार्यरत शिक्षकांनाच नवीन अभ्यासक्रमांचे प्रशिक्षण द्यावयाचे असल्याने त्यांना आवश्यकतेप्रमाणे प्रशिक्षण पंडीत सुंदरलाल शर्मा सेंट्रल इन्स्टिटयूट फॉर व्होकेशनल एज्युकेशन (PSSCIVE), भोपाळ, सेक्टर स्कील कौन्सिल किंवा अन्य यंत्रणेमार्फत आयोजित करण्याची जबाबदारी संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांची राहील. तथापि नवीन शिक्षकांची नेमणूक करताना शिक्षकांनी परिशिष्ट - क मध्ये नमूद शैक्षणिक अर्हता व अनुभव धारण करणे आवश्यक राहील.

७. "परिशिष्ट अ" मध्ये दर्शविण्यांत आलेले नवीन व्यवसाय अभ्यासक्रम (जॉब रोल) तसेच "परिशिष्ट क" मध्ये दर्शविण्यांत आलेली नवीन व्यवसाय अभ्यासक्रमासाठीची शैक्षणिक अर्हता यामध्ये कोणताही बदल करावयाचा असल्यास त्याकरीता पंडीत सुंदरलाल शर्मा सेंट्रल इन्स्टिटयूट फॉर व्होकेशनल एज्युकेशन (PSSCIVE), भोपाळ, यांची मान्यता अनिवार्य राहील.

८. नविन अभ्यासक्रमांची संदर्भ पुस्तके संचालनालयाच्या अधिकृत संकेतस्थळावर विद्यार्थ्यांना उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांची राहिल.

९. नवीन अभ्यासक्रमाकरीता आवश्यक असणाऱ्या यंत्रसामुग्रीच्या याद्या संचालनालय स्तरावरून निश्चित करण्यांत येतील तसेच सदर याद्या वेळोवेळी अद्ययावत करण्यात येतील.

१०. संदर्भ क्र. ०१ मधील शासन निर्णयातील सहपत्रब मध्ये नमूद केमिकल प्लँट- ऑपरेटर, फिश प्रोसेसिंग टेक्नॉलॉजी व फ्रेश वॉटर फिश कल्चर या व्यवसाय अभ्यासक्रमांशी सुसंगत अभ्यासक्रम (जॉब रोल) पंडीत सुंदरलाल शर्मा सेंट्रल इन्स्टिटयूट फॉर व्होकेशनल एज्युकेशन (PSSCIVE), भोपाळ, येथे उपलब्ध नाहीत. सबब सदर अभ्यासक्रम सुरु राहणार नसल्याने या अभ्यासक्रमांमध्ये सत्र २०२४- २५ करीताइ.११ वी मध्ये प्रवेश करता येणार नाहीत .त्यामुळे या व्यवसाय अभ्यासक्रमांऐवजी सहपत्र - अ मध्ये नमूद केलेल्या अन्य व्यवसाय अभ्यासक्रमाची निवड करुन सदर व्यवसाय अभ्यासक्रम इ.११ वी साठी शैक्षणिक सत्र २०२४-२५ पासून सुरु करण्याकरीता महाविद्यालय व्यवस्थापनाने संचालनालयाच्या vti.dvet.gov.in या संकेतस्थळावर ऑनलाईन पध्दतीने अर्ज करणे आवश्यक राहील

११. हा शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर दिनांक १० मे २०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार महाविद्यालयांना द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या नवीन संस्था व अधिकच्या तुकडयांना कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्वावर व्यवसाय अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता देण्याची कार्यवाही करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा सांकेताक क्र. २०२३११२४१६५६२३३७०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRINIVAS JAGANNATH SHASTRI

Digitally signed by SHRINIVAS JAGANNATH SHASTRI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=562c9a4a27312e1de46dbbd470c2f1a3e466d159bc4c9bd7f2f9cc64766abce2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C02F19AC7E7AB3A50D817C95CF483E33229CF0CBB03283B175900630F81D2337, cn=SHRINIVAS JAGANNATH SHASTRI
Date: 2023.11.24 16:58:40 +05'30'

**( श्रीनिवास शास्त्री )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.मंत्री कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
३) अ.मु.स., कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक.
४) आयुक्त, शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) संचालक, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
६) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे/नाशिक/ औरंगाबाद / अमरावती/नागपूर.
८) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (व्य.शि. व प्र. संचालनालयामार्फत)
९) निवडनस्ती.

## परिशिष्ट – अ

## +२ स्तरावरील नवीन द्विलक्षी व्यवसाय (Bifocal) अभ्यासक्रमांची यादी

| अ.क्र. | व्यवसाय गटाचे नांव | सद्यस्थितीत सुरु असणाऱ्या व्यवसाय अभ्यासक्रमाचे नांव | पेपर | नवीन व्यवसाय अभ्यासक्रमाचे नांव |
|---|---|---|---|---|
| १ | गट – १ | Electrical Maintenance | विषय – १ | Field Technician-Wireman Control Panel (Qualification Pack:Ref.Id.ELE/Q7302) |
| २ | | | विषय – २ | Lineman Distribution (Qualification Pack: Ref.Id. PSS/Q0102) |
| ३ | गट – २ | Electronics | विषय – १ | Field Technician-Computing and Peripherals (Qualification Pack: Ref. Id. ELE/Q4601) |
| ४ | | | विषय – २ | Field Technician - Washing Machine (Qualification Pack :Ref. Id. ELE/Q3106) |
| ५ | गट – ३ | Scooter & Motor Cycle Servicing | विषय – १ | Four-Wheeler Service Technician (Old:- Auto Service Technician L4) (Qualification Pack: Ref. Id.ASC/Q1402) |
| ६ | | | विषय – २ | Auto Service Technician (Two and Three Wheeler) (Qualification Pack: Ref. Id.ASC/Q1411) |
| ७ | गट – ४ | Computer Science | विषय – १ | Junior Software Developer (Qualification Pack: Ref. Id. SSC/Q0508) |
| ८ | | | विषय – २ | Field Technician-Computing and Peripherals (Qualification Pack: Ref. Id. ELE/Q4601) |
| ९ | गट – ५ | General Civil Engineering | विषय – १ | General Mason (Qualification Pack: Ref.Id.CON/Q0103) |
| १० | | | विषय – २ | Construction Painter and Decorator (Qualification Pack: Ref. Id. CON/QP-0503 |
| ११ | गट – ६ | Mechanical Maintenance | विषय – १ | Plumber - General (Qualification Pack: Ref. Id. PSC/Q0104) |
| १२ | | | विषय – २ | Agriculture Machinery Operator (Qualification Pack:Ref.Id. AGR/Q1103) |
| १३ | गट – ७ | Commerce Group | विषय – १ | Business Correspondent and Business Facilitator (Qualification Pack: Ref. Id.BSC/Q8401) |
| १४ | | | विषय – २ | Distributor Salesman (Qualification Pack: Ref. Id. RAS/Q0604) |
| १५ | गट – ८ | Animal Science & Dairying | विषय – १ | Dairy Farmer / Dairy Entrepreneur (Qualification Pack: Ref. Id. AGR/Q4101) |
| १६ | | | विषय – २ | Small Poultry Farmer (Qualification Pack:Ref. Id. AGR/Q4306 |
| १७ | गट – ९ | Crop Science | विषय – १ | Organic Grower (Qualification Pack :Ref. Id. AGR/Q1201) |
| १८ | | | विषय – २ | Irrigation Service Technician (Qualification Pack :Ref. Id. AGR/Q1104) |
| १९ | गट – १० | Horticulture | विषय – १ | Floriculturist (Open Cultivation) (Qualification Pack : Ref. Id. AGR/Q0701) |
| २० | | | विषय – २ | Gardener (Qualification Pack : Ref. Id.AGR/Q0801) |

## परिशिष्ट – ब

### मानकाप्रमाणे अभ्यासक्रम निहाय आवश्यक असणारी जागा, यंत्रसामुग्री विद्युत पुरवठा
### +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रम

| अ. क्र. | अभ्यासक्रमाचे नाव | तुकडी | प्रवेश क्षमता | विद्युतभार (कि.वॅट) | वर्गखोल्या (चौ.फुट) | कार्यशाळा (चौ.फुट) | कृषीक्षेत्र/ खुली जागा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 6 | 7 | 8 | 9 |
| 1 | Field Technician-Wireman Control Panel (Qualification Pack:Ref.Id.ELE/Q7302) | 1 | 50 | 5 KW | 300 | 1000 | --- |
| 2 | Lineman Distribution (Qualification Pack: Ref.Id.PSS/Q0102) | | | | | 500 | --- |
| 3 | Field Technician-Computing and Peripherals (Qualification Pack: Ref. Id. ELE/Q4601) | 1 | 50 | 5 KW | 300 | 400 | |
| 4 | Field Technician - Washing Machine (Qualification Pack :Ref. Id. ELE/3106) | | | | | 300 | --- |
| 5 | Four-Wheeler ServiceTechnician (Old:- Auto Service Technician L4) (Qualification Pack: Ref. Id.ASC/Q1402) | 1 | 50 | 5 KW | 300 | 1000 | --- |
| 6 | Auto Service Technician (Two and Three Wheeler) (Qualification Pack: Ref. Id.ASC/Q1411) | | | | | 1000 | --- |
| 7 | Junior Software Developer (Qulification Pack: Ref. Id. SSC/Q0508) | 1 | 50 | 5 KW | 300 | 400 | --- |
| 8 | General Mason (Qualification Pack: Ref.Id.CON/Q0103) | 1 | 50 | 2 KW | 300 | 750 | 1500 Sq.ft.(Open Yard) |
| 9 | Construction Painter and Decorator (Qualification Pack: Ref. Id. CON/QP-0503 | | | | | 750 | |
| 10 | Plumber - General (Qualification Pack: Ref. Id. PSC/Q0104) | 1 | 50 | 5 KW | 300 | 800 | --- |
| 11 | Agriculture Machinery Operator (Qualification Pack:Ref.Id. AGR/Q1103) | | | | | 1000 | 5000 sq.ft. |
| 12 | Business Correspondent and Business Facilitator (Qualification Pack: Ref. Id.BSC/Q8401) | 1 | 50 | 2 KW | 300 | 440 | --- |
| 13 | Distributor Salesman (Qualification Pack: Ref. Id. RAS/Q0604) | | | | | 440 | --- |
| 14 | Dairy Farmer / Dairy Entrepreneur (Qualification Pack: Ref. Id. AGR/Q4101) | 1 | 50 | 3 KW | 300 | 1250 | 1 Acre |
| 15 | Small Poultry Farmer (Qualification Pack:Ref. Id. AGR/Q4306 | | | | | 1250 | 0.5 Acre |
| 16 | Organic Grower (Qulification Pack :Ref. Id. AGR/Q1201) | 1 | 50 | 2 KW | 300 | 1250 | 1 Acre |
| 17 | Irrigation Service Technician (Qualification Pack :Ref. Id. AGR/Q1104) | | | | | 1250 | 1 Acre |
| 18 | Floriculturist (Open Cultivation) (Qualification Pack : Ref. Id. AGR/Q0701) | 1 | 50 | 2 KW | 300 | 1250 | 1 Acre |
| 19 | Gardener (Qualification Pack : Ref. Id.AGR/Q0801) | | | | | 1250 | 1 Acre |

## परिशिष्ट -क

### +२ स्तरावरील द्विलक्षी व्यवसाय अभ्यासक्रमाच्या पूर्णवेळ शिक्षक (प्रात्यक्षिक) यांची शैक्षणिक अर्हता व अनुभव

| Sr. No. | New Course name | Qualification |
|---|---|---|
| 1 | Field Technician-Wireman Control Panel<br>(Qualification Pack:Ref.Id.ELE/Q7302) | Bachelor of Engineering in Electronics/ Electrical. Additionally should have done a Diploma or certificate course in Control Panel Wiring of residential / Industrial systems.<br>The suggested qualification is the minimum criteria. However higher qualifications such as Bachelor of Engineering in Electronics |
| 2 | Lineman Distribution<br>(Qualification Pack: Ref.Id.PSS/Q0102) | B. Tech in Electrical Engineering from a recognized Institute/ University, with at least 1 year work / teaching experience<br>OR<br>Diploma in Electrical Engineering with 3 years of work / teaching experience |
| 3 | Field Technician-Computing and Peripherals<br>(Qualification Pack: Ref. Id. ELE/Q4601) | Bachelor of Engineering / Technology in Electronics or Computer science / Technology<br>OR<br>Master of Computer Application (MCA) OR<br>Master of Science (Computer Science) OR<br>Master of Science (Information Technology) OR<br>NIELIT "B" Level Certificate.<br>It is recommended to have additional qualification such as CCNA, CCP or any other diploma in computer hardware maintenance. |
| 4 | Field Technician - Washing Machine<br>(Qualification Pake:Ref. Id. ELE/3106) | Bachelor of Engineering / Technology in Electrical /Electronics<br>OR<br>Master of Science in Electronics / Electrical.<br>It is recommended to have the specialised qualifiation in Washing Machine Technology. |
| 5 | Four-Wheeler Service Technician<br>(Old:- Auto Service Technician L4)<br>(Qualification Pack: Ref. Id.ASC/Q1402) | Degree in Automobile Engineering /Mechanical Engineering from a recognized Institute/University, with at least 1 - year work / teaching experience<br>Or<br>Diploma in Automobile Engineering /Mechanical Engineering from a recognized Institute/University, with at least 1 - year work / teaching experience |
| 6 | Auto service Technician (Two and Three Wheeler)<br>(Qualification Pack: Ref. Id.ASC/Q1411) | Degree in Automobile or Mechanical Engineering from a recognized Institute/University, with at least 1 - year work / teaching experience<br>Or<br>diploma inAutomobile or Mechanical Engineering from a recognized Institute/University, with at least 3 - year work / teaching experience<br>Or<br>B.voc in Automotive with at least 1 year of experience |

| Sr. No. | New Course name | Qualification |
|---|---|---|
| 7 | Junior Software Developer (Qulification Pack: Ref. Id. SSC/Q0508) | Bachelor of Engineering/ Technology in Computer Science / Technology OR<br>Master of Computer Application (MCA) OR<br>Master of Science (Computer Science) OR<br>Master of Science (information technology)<br>OR<br>NIELIT "B" Level Certificate.<br>**Desirable** : Knowleage of Software Development |
| 8 | General Mason (Qualification Pack: Ref.Id.CON/Q0103) | B. Tech in Civil Engineering from a recognized Institute /University, with at least 1 year work / teaching experience<br>OR<br>Diploma in Civil Engineering with 2 year work / teaching experience |
| 9 | Construction Painter and Decorator (Qualification Pack: Ref. Id. CON/QP-0503 | Degree in Engineering from a recognized Institute /University, with at least 1 year working /teaching experience<br>OR<br>Diploma in Engineering from a recognized Institute /University with at least 2 years working/ teaching experience<br>OR<br>Any graduate having working or teaching experience of 2 years in construction painting<br>**Desirable**: Should have a valid certificate of trainer in the domain of "Construction Painter and Decorator, Level 4" or Painter course approved by any government institute |
| 10 | Plumber - General<br>(Qualification Pack: Ref. Id. PSC/Q0104) | B. Tech in Civil Engineering/ Agricultural Engineering/ Mechanical Engineering / B.Voc.(Bachelor in Vocation) from a recognized Institute/University, with at least 1-year work / teaching experience<br>OR<br>Diploma in Civil engineering / Agricultural Engineering/ Mechanical Engineering with 2 years work / teaching experience. |
| 11 | Agriculture Machinery Operator (Qualification Pack:Ref.Id. AGR/Q1103) | Degree in Agricultural Engineering<br>OR<br>Mechanical Engineering from a recognized Institute/University, with at least 1 year work / teaching experience<br>OR<br>Diploma in Agricultural Engineering or Civil engineering from a recognized Institute / University, with at least 3 year work / teaching experience |
| 12 | Business Correspondent and Business Facilitator<br>(Qualification Pack: Ref. Id.BSC/Q8401) | Post- graduation in Commerce/ management/ finance from a recognized institute/University, with at least one year work experience |

| Sr. No. | New Course name | Qualification |
|---|---|---|
| 13 | Distributor Salesman (Qualification Pack: Ref. Id. RAS/Q0604) | M.Com in Marketing Management/ P.G. Diploma in Marketing Management with at least 50% marks and 1 year experience. Preference given to higher education with MBA (Marketing Management) and P.G. Diploma in Marketing Management. |
| 14 | Dairy Farmer / Dairy Entrepreneur (Qualification Pack: Ref. Id. AGR/Q4101) | Post- graduation in Dairying/Animal Husbandry from a recognized Institute/University, with at least 1 year work experience. |
| 15 | Small Poultry Farmer (Qualification Pack:Ref. Id. AGR/Q4306 | Bachelors in Veterinary Science<br>OR<br>Post- graduation in agriculture/life science with specialization in Poultry Science / Livestock Production Management/Animal Genetics & Breeding /from a recognized Institute/ University, with at least two years' work experience. |
| 16 | Organic Grower (Qulification Pack :Ref. Id. AGR/Q1201 | Post- Graduation in Agriculture/ Horticulture from a recognized Institute/University, with at least 1 year work / teaching experience |
| 17 | Irrigation Service Technician (Qualification Pack :Ref. Id. AGR/Q1104) | Degree in Agricultural Engineering or Civil Engineering from a recognized Institute/ University, with at least 1 year work / teaching exprience<br>OR<br>Diploma in Agricultural Engineering or Civil Engineering from a recognized Institute / University, with at least 3 year work / teaching experience. |
| 18 | Floriculturist (Open Cultivation) (Qualification Pack : Ref. Id. AGR/Q0701) | Post- graduation in Horticulture from a recognized Institute / University, with at least 1 year work experience |
| 19 | Gardener (Qualification Pack : Ref. Id.AGR/Q0801) | Post- graduation in Horticulture from a recognized Institute / University, with at least 1 year work experience |